वन विकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमा
पासून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या
योजनांसाठी निधी पुरवठा करणे .

**शासन निर्णय**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -चाबाप्र -२०१५/प्र.क्र.११०/फ-५**
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २२.०६.२०१५.

वाचा - १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं - २०१५ /प्र.क्र.८५/अर्थ -३ दि.१७.०४.२०१५.
२. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य ,नागपुर यांचे पत्र क्र.कक्ष - २(१)/असं./प्र.क्र.०४/९१/२०१५-१६ दि.१९.०६.२०१५.

**प्रस्तावना** -

श्रीमती शोभाताई फडणवीस विरूद्ध महाराष्ट्र शासन , रिट पिटीशन क्र.१२७७ /२००० या न्यायालयीन प्रकरणी मा.उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ नागपूर येथे शासनाच्यावतीने सादर केलेल्या श्वेतपत्रिकेच्या अनुषंगाने वन विभागास वन संरक्षकासाठी वन करामधून प्राप्त झालेल्या निधीतून अतिरीक्त निधी उपलब्ध करून देण्यात यावा असे मा.न्यायालयाने स्पष्ट निर्देश दिले आहेत. त्यानुसार सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी प्रधान लेखाशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन,१०२ (०८)(०१) वन विकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) (योजनेतर) या शिर्षाखालील रू.१६६.९१ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतुद आहे . सदरहू निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. रिट पिटीशन क्र.१२७७ /२००० मध्ये मा.उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या आदेशानुसार सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता वन संरक्षणासाठी प्रधान लेखाशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन,१०२ (०८)(०१) वन विकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) (योजनेतर) या शिर्षाखालील खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय रू.१६६.९१ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आली आहे .

(रक्कम रूपये लाखात )

| अ.क्र. | बाब / उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय तरतुद |
|---|---|---|
| १ | ०२ - मजुरी | रू. ९०.५२ |
| २ | १३ - कार्यालयीन खर्च | रू.६६.७३ |
| ३ | २१ - पुरवठा व सामग्री | रू. ०.०० |
| ४ | २७ - लहान बांधकामे | रू.९.६६ |
| ५ | ५० - इतर खर्च | रू. ०.०० |
| ६ | एकुण | रू. १६६.९१ |

२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं -२०१५/प्र.क्र.८५/अर्थ -३ दि.१७.०४.२०१५ अन्वये अर्थसंकल्पीय निधीच्या ७०% निधी वितरीत करण्यास प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान करण्यात आलेआहेत. त्यास अनुसरून सदरहू योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रूपये लाखात)

| उद्दिष्ठ | अर्थसंकल्पीय तरतुद | वित्त विभागाने वितरणासाठी दिलेली मर्यादा | वितरणासाठी प्रस्तावित निधी |
|---|---|---|---|
| ०२ मजुरी | रू. ९०.५२ | ७०% | रू.६३.३६४ |
| १३ कार्यालयीन खर्च | रू.६६.७३ | ७० % | रू.४६.७११ |
| २७ लहान बांधकामे | रू.९.६६ | ७० % | रू.६.७६२ |
| | रू. १६६.९१ | | रू.११६.८३७ |

३. सदर खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरणप्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्ची टाकण्यात यावा.यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदरहू खर्च सन २०१५-१६ मध्ये "मुख्य लेखाशिर्ष- मागणी सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन,१०२ (०८)(०१) वन विकास करापासून मिळणाऱ्या जमा रकमामधून वित्त व्यवस्था करण्यात आलेल्या योजना (४४०६ ०१७१) (योजनेत्तर)" या लेखाशिर्षातर्गंत करण्यात यावा.

५. सदरहू शासन निणर्य वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं - २०१५ /प्र.क्र.८५/अर्थ -३ दि.१७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६२२१७२४०६२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DHAS ANIL N

Digitally signed by DHAS ANIL N
DN: CN = DHAS ANIL N, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917247
Date: 2015.06.22 17:26:17 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र वन विकास महामंडळ,नागपुर

३) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
४) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) चंद्रपुर .
५) महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
६) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७) वित्त विभाग (अर्थ - ६) / (व्यय -१०) मंत्रालय,मुंबई
८) कार्यासन अधिकारी ब-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
९) निवड नस्ती (फ-५)